**राज्य स्तरावर ग्रामिण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी पाणी पुरवठा व स्वच्छता सहाय्य संस्था(WSSSO) स्थापन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्र.ग्रापाधो-१११९/प्र.क्र.८/पापु-०७**
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२ ,दि. १७ जानेवारी,२०११

**वाचा-** शासन निर्णय,पा.पु.व.स्व.वि.क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.११६/पापु-०७,
दि.२५ ऑगस्ट, २००९

**प्रस्तावना :**

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये ग्रामिण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी पाणी पुरवठा व स्वच्छता सहाय्य संस्थेची (WSSSO) स्थापना करण्यात आली आहे.सदर शासन निर्णयातील परि.१४ मध्ये महाराष्ट्र राज्य पाणी पुरवठा व स्वच्छता संस्था नोंदणीकृत झाल्यानंतर सध्या कार्यरत असलेल्या सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष(R$PMU),संवाद क्षमता व विकास कक्ष (CCDU),आपलं पाणी (KFW) व भारत निर्माण कक्ष हे सर्व कक्ष या नोंदणीकृत संस्थेत विलिन करण्यात येतिल व त्यातील कार्याक्षम अधिकारी/कर्मचारी यांना आवश्यकतेनुसार विलिन करण्यात येईल, अशी तरतूद करण्यात आली आहे.तथापि ग्राम विकास मंत्रालय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,भारत सरकार यांचे पत्र क्र.W-११०४२/७२/२००९-water, दि. २४ ऑगस्ट,२०१० अन्वये देण्यात आलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार पाणी पुरवठा व स्वच्छता सहाय्य संस्थेवरिल अधिकारी/कर्मचारी यांची नियुक्ती प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षते खालील राज्य स्तरीय निवड समितीने करावयाची आहे. त्याअनुषंगाने संदर्भाधिन शासन निर्णयातील परि.क्र.१४ रद्द करुन तो सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन शुध्दपत्रक-**

उपरोक्त प्रस्तावनेतील माहिती विचारात घेता संदर्भाधिन शासन निर्णयातील परि.क्र.१४ रद्द करुन तो खालील प्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे-

**परिच्छेत १४-अ)** पाणी पुरवठा व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSSO) नोंदणीकृत झाल्यानंतर सध्या कार्यरत असलेल्या सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (RSPMU),संवाद क्षमता व विकास कक्ष (CCDU),आपलं पाणी (KFW) व भारत निर्माण कक्ष हे सर्व कक्ष WSSSO या नोंदणीकृत संस्थेत

विलिन करण्यात येतील. पाणी पुरवठा व स्वच्छता सहाय्य संस्था (WSSSO) या संस्थेवरील कर्मचारी/अधिकारी यांची नियुक्ती ग्राम विकास मंत्रालय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,भारत सरकार यांचे पत्र क्र.w-११०४२/७२/२००९-water, दि.२४ ऑगस्ट, २०१० अन्वये देण्यात आलेल्या निर्देशांप्रमाणे करण्यात येईल..

ब) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता सहाय्य संस्थेवरील पदे भरण्याकरीता शासन स्तरावर खालील प्रमाणे निवड समिती स्थापन करण्यात येत आहे-

१) प्रधान सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग - अध्यक्ष

२) उप सचिव(पापु-०७), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग - सदस्य

३) प्रकल्प व्यवस्थापक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष - सदस्य

४) संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा - सदस्य

५) केंद्र शासनाचे २ प्रतिनिधी - सदस्य

६) सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण - सचिव

७) संचालक, पाणी पुरवठा व सहाय्य संस्था(इतर कर्मच्या-यांकरीता) - सदस्य

८) कक्ष अधिकारी,(पापु -०७),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, - सदस्य सचिव

सदर शासन शुद्धपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब-साईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०११७१८४४२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**

(प्राजक्ता लवंगारे-वर्मा)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,
मा.मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्य मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई
संचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे,
मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व जिल्हा परिषदा
सर्व अधिक्षक अभियंता,विभागीय भारत निर्माण कक्ष

सर्व कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,
सर्व कार्यकारी अभियंता,ग्रामिण पाणी पुरवठा विभ ाग,जिल्हा परिषद
महालेखापाल,महाराष्ट्र - १ मुंबई(लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल,महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई
उप मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा, नाशिक,पुणे,औरंगाबाद,अमरावती व नागपूर
सर्व प्रादेशिक उपसंचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,
सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
मुख्य अभियंता,भारत निर्माण कक्ष,नवी मुंबई
सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
सर्व गट विकास अधिकारी,पंचायती समिती
नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
पाणी पुरवठा विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने
निवड नस्ती,पापु-०७